सर्व शिक्षा अभियान अंतर्गत
सन २०१७-१८ करिता वर्गखोली बांधकामे व इतर कामांसाठी एकक किंमत निश्चित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसएसए २६१७/प्र.क्र.२६/एस एम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०७ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सर्व शिक्षा अभियान नियमावलीमध्ये वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रकात बांधकाम विषयक निकषानुसार घेण्यात येणाऱ्या बाबींबाबत कळविले आहे. सर्व शिक्षा अभियान अंतर्गत विहित बांधकाम आराखडा व निकषानुसार मूलभूत भौतिक सुविधांच्या बांधकामाच्या एकक किंमती (Unit Cost) संदर्भातील सूचनेमध्ये दरसूचीनुसार राज्य शासनाने नवीन प्राथमिक शाळा, उच्च प्राथमिक शाळा व इतर मूलभूत भौतिक सुविधांच्या बांधकामांचे अधिसूचित केलेले निकष असतील असे नमूद केले आहे. त्यानुसार सर्व शिक्षा अभियान अंतर्गत बांधकामासाठी सन २०१७-१८ करिता एकक किंमतीचे निकष ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात प्राथमिक शिक्षणाच्या सार्वत्रिकरणासाठी सन २००१-०२ पासून सर्व शिक्षा अभियान कार्यक्रम राबविण्यात येत आहे. यामध्ये प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळांना मुलभूत सुविधा मंजूर करण्यात येतात या योजनेंतर्गत गटसाधन केंद्र, समूहसाधन केंद्र, नवीन प्राथमिक शाळा, सर्व प्रकारच्या वर्गखोल्या तसेच मूलभूत भौतिक सूविधांची बांधकामे करण्यात येत आहे. याकरिता सदर बांधकामांसाठी सन २०१७-१८ करिता पुढीलप्रमाणे एकक दर निश्चित करण्यात येत आहे. :-

१) या कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई कार्यालयाने विहित केलेल्या बांधकाम आराखडयानुसार (Drawing & Design) सन २०१७-१८ करिता बांधकामासाठी लागणारी एकक रक्कम ही संपूर्ण राज्यासाठी (पुणे, रायगड, ठाणे, नंदुरबार, नाशिक, गडचिरोली, सातारा, सांगली व पालघर तसेच मुंबई महानगरपालिका वगळून) खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | उपक्रम | सन २०१६-१७ करिता मंजूर एकक रक्कम (रुपये) | सन २०१७-१८ करिता प्रस्तावित एकक रक्कम (रुपये) | वाढ झालेल्या एकक रकमेची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|
| | बांधकाम | | | |
| १ | **नवीन प्राथमिक शाळा -** सदरहू नवीन प्राथमिक शाळा बांधकामामध्ये दोन वर्गखोली व मुख्याध्यापक खोली बांधकाम खर्च रु. १३.२६ लक्ष + स्वच्छतागृह (मुलांचे) रु. १.९० लक्ष + स्वच्छतागृह (मुलींचे) रु. १.९० लक्ष + पिण्याच्या पाण्याची सुविधा रु. १.५० लक्ष | २६.४९ लक्ष | २८.१६ लक्ष | ६.३०% |

| अ.क्र. | उपक्रम | सन २०१६-१७ करिता मंजूर एकक रक्कम (रुपये) | सन २०१७-१८ करिता प्रस्तावित एकक रक्कम (रुपये) | वाढ झालेल्या एकक रकमेची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|
| | + विद्युतीकरण रु. ०.३० लक्ष + स्वयंपाकगृह रु. २.०० लक्ष + Child Friendly Elements रु. ०.४० लक्ष + आवार भिंत रु. ६.९० लक्ष या बाबींचा अंतर्भाव आहे. | | | |
| २ | अ) **नवीन उच्च प्राथमिक शाळा एक वर्गखोली बांधकामासाठी एकक रक्कम (सपाट तसेच ग्रामीण भागाकरीता)** प्रति वर्गखोली बांधकाम एकक रक्कम यामध्ये वर्गखोली बांधकाम खर्च रु.७.०७ लक्ष + Child Friendly Elements रु. ०.४० लक्ष + विद्युतीकरण रु. ०.३० लक्ष या बाबींचा अंतर्भाव आहे. | ७.२० लक्ष | ७.७७ लक्ष | ७.९२% |
| | **ब) नवीन उच्च प्राथमिक शाळा / अतिरिक्त वर्गखोली** (शहरी भाग तसेच अतिदुर्गम / डोंगराळ / काळ्या मातीतील भागाकरीता) प्रति वर्गखोली बांधकाम एकक रक्कम यामध्ये वर्गखोली बांधकाम खर्च रु. ७.७२ लक्ष + Child Friendly Elements रु. ०.४० लक्ष + विद्युतीकरण रु. ०.३० लक्ष या बाबींचा अंतर्भाव आहे. | ७.७८ लक्ष | ८.४२ लक्ष | ८.२२% |
| ३ | शालेय स्वच्छतागृह मुलांकरिता | १,७५,०००/- | १,९०,०००/- | ८.५७% |
| ४ | शालेय स्वच्छतागृह मुलींकरिता | १,७५,०००/- | १,९०,०००/- | ८.५७% |
| ५ | शाळांना पिण्याच्या पाण्याची सुविधा | १,३०,०००/- | १,५०,०००/- | १५.३८% |
| ६ | शालेय विद्युतीकरण | ३०,०००/- | ३०,०००/- | - |
| ७ | संरक्षक भिंत बांधकाम प्रती मीटर | ६,५००/- | ६,९००/- | ६.१५% |
| ८ | उताराचा रस्ता (Ramp with hand rail १:१२ या प्रमाणानुसार) | २२,०००/- | २४,०००/- | ९.०९% |
| ९ | स्वच्छ भारत, स्वच्छ विद्यालय अभियान अंतर्गत शाळांमध्ये Hand Wash Station सुविधा उपलब्ध करणे | १५,०००/- | १५,०००/- | - |
| १० | विशेष गरजू मुलांकरिता Commode Toilet सुविधा उपलब्ध करणे | २०,०००/- | २४,०००/- | २०.००% |

२) पुणे, रायगड, ठाणे, नंदुरबार, नाशिक, गडचिरोली, सातारा, सांगली व पालघर या अतिदुर्गम भाग असलेल्या जिल्ह्यांना तसेच मुंबई महानगरपालिकेकरिता सदर बांधकामांना जास्त रक्कम लागणार आहे. सबब सदर जिल्ह्यांकरिता व मुंबई महानगरपालिकेकरिता सर्व शिक्षा अभियान अंतर्गत विहित बांधकाम आराखडा (Design & Drawing) व निकषानुसार बांधकामाकरिता पुढीलप्रमाणे एकक रक्कम निश्चित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उपक्रम | सन २०१६-१७ करिता मंजूर एकक रक्कम (रुपये) | सन २०१७-१८ करिता प्रस्तावित एकक रक्कम (रुपये) | वाढ झालेल्या एकक रकमेची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|
| | **(पुणे / रायगड / ठाणे / नंदूरबार /नाशिक / गडचिरोली / सातारा / सांगली व पालघर हे जिल्हे व मुंबई महानगरपालिका अंतर्गत) बांधकामे** | | | |
| १. | **नवीन प्राथमिक शाळा -** शहरी तसेच ग्रामीण भागाकरीता (मुंबई वगळून) एकक रक्कम सदरहू नवीन प्राथमिक शाळा बांधकामांमध्ये दोन वर्गखोली व मुख्याध्यापक खोली बांधकाम खर्च रु.१४.९० लक्ष + स्वच्छतागृह (मुलांचे) रु. १.९० लक्ष + स्वच्छतागृह (मुलींचे) रु. १.९० लक्ष + पिण्याच्या पाण्याची सुविधा रु. १.५० लक्ष + विद्युतीकरण रु. ०.३० लक्ष + स्वयंपाकगृह रु. २.०० लक्ष + Child Friendly Elements रु. ०.४० लक्ष + आवार भिंत रु. ६.९० लक्ष या बाबींचा अंतर्भाव आहे. | २७.८४ लक्ष | २९.८० लक्ष | ७.०४% |
| २. | **नवीन उच्च प्राथमिक शाळा (शहरी तसेच ग्रामीण भागाकरिता (मुंबई वगळून) प्रति वर्गखोली एकक रक्कम** सदरहू बांधकामांमध्ये वर्गखोली बांधकाम खर्च रु. ९.०४ लक्ष + Child Friendly Elements रु. ०.४० लक्ष +विद्युतीकरण रु. ०.३० लक्ष या बाबींचा अंतर्भाव आहे. | ९.०० लक्ष | ९.७४ लक्ष | ८.२२% |
| ३. | **मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील वर्गखोली बांधकाम एकक रक्कम** | २४.३१ लक्ष | २६.३१ लक्ष | ८.२२% |
| ४. | **शालेय स्वच्छतागृह मुलांकरिता** | १,७५,०००/- | १,९०,०००/- | ८.५७% |
| ५. | **शालेय स्वच्छतागृह मुलींकरिता** | १,७५,०००/- | १,९०,०००/- | ८.५७% |

| अ.क्र. | उपक्रम | सन २०१६-१७ करिता मंजूर एकक रक्कम (रुपये) | सन २०१७-१८ करिता प्रस्तावित एकक रक्कम (रुपये) | वाढ झालेल्या एकक रकमेची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|
| ६. | **शाळांना पिण्याच्या पाण्याची सुविधा** | १,३०,०००/- | १,५०,०००/- | १५.३८% |
| ७. | **शालेय विद्युतीकरण** | ३०,०००/- | ३०,०००/- | - |
| ८. | **संरक्षक भिंत बांधकाम प्रती मीटर** | ६,५००/- | ६,९००/- | ६.१५% |
| ९. | **उताराचा रस्ता** (Ramps with hand rail १:१२ **या प्रमाणानुसार** | २२,०००/- | २४,०००/- | ९.०९% |
| १०. | **स्वच्छ भारत, स्वच्छ विद्यालय अभियान अंतर्गत शाळांमध्ये** Hand Wash Station **सुविधा उपलब्ध करणे.** | १५,०००/- | १५,०००/- | - |
| ११. | **विशेष गरजू मुलांकरिता** Commode Toilet **सुविधा उपलब्ध करणे** | २०,०००/- | २४,०००/- | २०.००% |

**३)** निवासी शाळा :- तोरणमाळ (ता.धडगाव, जि.नंदुरबार) केंद्रातील विद्यार्थ्यांकरिता आंतरराष्ट्रीय दर्जाची निवासी शाळा स्थापन करावयाची आहे. यामध्ये १६०० विद्यार्थी (मुले-८०० व मुली-८००) शिक्षण घेणार असून १६०० विद्यार्थ्यांकरिता (मुले-८०० व मुली-८००) निवास व्यवस्था करण्यात येणार आहे. सदर निवासी शाळा बांधकामाकरिता अंदाजित खर्च पुढीलप्रमाणे आहे.:-

| अ.क्र. | उपक्रम | क्षेत्रफळ चौ. फुट | अंदाजित रक्कम |
|---|---|---|---|
| १ | शाळा इमारत बांधकाम (१६०० विद्यार्थ्यांकरिता) | ६१६०४.५२ | रु. ८८०.५४ लक्ष |
| **१अ)** | फर्निचर (१६०० विद्यार्थ्यांकरिता रु. २०००/- प्रती विद्यार्थी याप्रमाणे ) | | रु. ३२.०० लक्ष |
| | **शाळा इमारत बांधकाम फर्निचरसह** | **एकूण (१)** | **रु. ९१२.५४ लक्ष** |
| **२** | वसतीगृह इमारत बांधकाम (१६०० विद्यार्थ्यांकरिता) | | |
| **२अ)** | ८०० मुलांकरिता | १ इमारत - ३४७४७.९१ चौ.फुट<br>३ इमारतीकरिता १०४२४३.७४ चौ.फुट | १ इमारत - रु.५४३.०३ लक्ष<br>३ इमारतीकरिता -रु.१६२९.०९ लक्ष |
| **२ब)** | ८०० मुलींकरिता | १ इमारत - ३४७४७.९१ चौ.फुट<br>३ इमारतीकरिता १०४२४३.७४ चौ.फुट | १ इमारत - रु.५४३.०३ लक्ष<br>३ इमारतीकरिता -रु.१६२९.०९ लक्ष |
| | **वसतीगृह इमारत बांधकाम** | **एकूण (२)** | **रु. ३२५८.१८ लक्ष** |
| | **शाळा इमारत बांधकाम व वसतीगृह इमारत बांधकाम एकूण खर्च** (१+२) | | **रु. ४१७०.७२ लक्ष** |

४) **स्वयंपाकगृह बांधकामे** (Kitchen Shed Cum store)- शालेय पोषण आहार या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विद्यार्थी पटसंख्येच्या प्रमाणात Plinth Area Norms नुसार पुढीलप्रमाणे स्वयंपाकगृह बांधकामांची एकक रक्कम निश्चित करण्यात येत आहे. :-

| अ. क्र. | शाळेतील विद्यार्थी संख्या (इ.१ली ते ८वी पर्यंत) (पटसंख्येनुसार) | स्वयंपाकगृह बांधकाम प्रकार | क्षेत्रफळ (चौ.मी.) | सन २०१६-१७ करिता मंजूर एकक रक्कम (रुपये) | सन २०१७-१८ करिता प्रस्तावित एकक रक्कम (रुपये) | वाढ झालेल्या एकक रकमेची टक्केवारी (%) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | १०० पेक्षा कमी | Type “A” | ११.९७ | १,६१,८००/- | १,७५,१००/- | ८.२२% |
| २. | १०० ते २०० | Type “B” | १८.०४ | २,२६,१००/- | २,४४,६८५/- | ८.२२% |
| ३. | २०० पेक्षा जास्त | Type “C” | २७.५८ | ३,१९,५००/- | ३,४५,७६३/- | ८.२२% |

२. सर्व शिक्षा अभियान अंतर्गत वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक सन २०१७-१८ मधील बांधकामांकरिता एकक रक्कम वरीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

३. उपरोक्त सर्व एकक दर हे सन २०१७-१८ मधील सर्व शिक्षा अभियान अंतर्गत शालेय बांधकामाकरिता लागू राहतील, त्याचप्रमाणे राज्य शासनाच्या इतर योजनांमधून होणारी शालेय बांधकामे, सर्व शिक्षा अभियानाच्या बांधकाम आराखडा (Drawing & R.C.C. Design) नुसार केल्यास त्या बांधकामांना देखील सदर एकक दर लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०७१६१०४६१३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=dc74b0493b4979ad0aa76763f873c23fa35ecb44970562d4aa14a832b6357e54, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.02.07 16:13:03 +05'30'

( रा.ग.गुंजाळ )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व लोकसभा / राज्यसभा सदस्य (महाराष्ट्र)
६. सर्व विधानसभा / विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई
७. मा. मुख्य सचिवांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

८. मंत्रालयीन विभाग (सर्व)

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर.

१०. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर.

११. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

१२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

१३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

१४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई

१५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक

१६. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद

१७. सर्व शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई

१८. अभ्यासगटांचे सर्व सदस्य / पदाधिकारी

१९. अधिदान व लेखाधिकारी, बृहन्मुंबई

२०. निवासी लेखाधिकारी, मुंबई

२१. निवड नस्ती (एसएम-१).